प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या अधिपत्याखालील पदविकाधारक कनिष्ठ अभियंता, (गट-क) यांना शाखा अभियंता (गट-ब) म्हणून दर्जोन्नती देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक: एफएसटी-१२/२०/प्र.क्र.२१४/फ-४**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दि. २९ ऑक्टोंबर, २०२१

**वाचा:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एस-३०/१९९४/प्र.क्र.१२४/फ-४, दि.२४.१०.१९९४.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एस-३०/१९९३/प्र.क्र.१२४/फ-४, दि.०७.०९.१९९५.

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एफएसटी-१३९८/प्र.क्र.२५४/फ-४, दि.२४.११.२००३.

४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एफएसटी-१३/०४/२११९/प्र.क्र.६/फ-४, दि.२९.१.२००४.

५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्रक्र.७७/फ-८, दि.१३.९.२०१९

६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन व दुय्यम संवर्ग), नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/ आस्था-१/प्रक्र.३४(१९-२०)/६२/२०-२१, दि.२५.९.२०२०

७) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफएसटी-१२/२०/प्र.क्र.२१४/फ-४, दि.५.३.२०२१.

**प्रस्तावना:-**

वन विभागाच्या पदांचा आढावा शासन संदर्भिय क्र.५ येथील दि.१३.०९.२०१९ च्या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला आहे. सदर पदाच्या आढाव्यामध्ये वन विभागाच्या अभियांत्रिकी शाखेसाठी कनिष्ठ अभियंता (वेतनश्रेणी - एस -१४,३८६०० - १२२८००) या संवर्गात १० पदे मंजूर करण्यात आली असून, शाखा अभियंता (वेतनश्रेणी एस -१५,४१८००-१३२३००) या संवर्गात एकूण १७ पदे मंजूर करण्यात आलेली आहेत. शासन संदर्भिय अनु.क्र.१ येथील दि.२४.१०.१९९४ च्या आदेशान्वये वन विभागातील कनिष्ठ अभियंता यांना पाटबंधारे विभागातील कनिष्ठ अभियंता प्रमाणे पदविकाधारक व अर्हतारहित कनिष्ठ अभियंता यांना शाखा अभियंता, गट- ब (राजपत्रित) या संवर्गात दर्जोन्नती देण्याचा धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर निर्णय घेतल्यानंतर संदर्भाधीन क्र.२, ३ व ४ च्या शासन निर्णयान्वये एकूण ३३ कनिष्ठ अभियंता यांना शाखा अभियंता पदाचा दर्जा देण्यात आला आहे. आता, एकूण ६ कनिष्ठ अभियंत्यांना शाखा अभियंता पदावर दर्जोन्नती देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

संदर्भिय क्र.१ येथील शासन निर्णय दि.२४.१०.१९९४ मधील तरतुदी तसेच संदर्भिय क्र. ७ येथील दि.५.३.२०२१ च्या आदेशान्वये निश्चित करण्यात आलेली कार्यपध्दती व शाखा अभियंता यांची

उपलब्ध पदे लक्षात घेऊन प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य नागपूर यांचे अधिपत्याखालील पदवीकाधारक कनिष्ठ अभियंता, गट-क (वेतनश्रेणी एस-१४, ३८६००-१२२८००) यांना ५ वर्षाच्या सेवेनंतर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकापासून शाखा अभियंता, गट-ब (वेतनश्रेणी एस-१५, ४१८००-१३२३००) म्हणून दर्जोन्नती देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **कनिष्ठ अभियंत्यांचे नाव** | **(श्रेणीवाढीचा दिनांक)** |
|---|---|---|
| १ | श्री.सागर वि.वैद्य | १८.०३.२०१९ |
| २ | श्री.सुजितकुमार सा.गणवीर | १९.०४.२०१९ |
| ३ | श्री.राहूल शं.तेलंग | २०.१०.२०१९ |
| ४ | कु.स्वाती शां.गंड्रतवार | १८.०९.२०१९ |
| ५ | श्री.सत्यवान वा.दिवे | १३.०१.२०२० |
| ६ | श्री.विक्रांत व्यं. घरोटे | ०६.०२.२०२० |

२. नियुक्त शाखा अभियंता यांची वेतन निश्चिती प्रचलित तरतुदीनुसार करण्यात यावी.

३. उपरोक्त नेमणूक महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२९१२३४१८३६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

ASHOK KASHINATH LAKKAS

Digitally signed by ASHOK KASHINATH LAKKAS
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=84261302514df14d17b0d46bb1422d22bfc355b1a840ece50f14894cd6b0da24, cn=ASHOK KASHINATH LAKKAS
Date: 2021.10.29 12:37:03 +05'30'

**( अ. का. लक्कस )**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन व दुय्यम संवर्ग), नागपूर
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर / मुंबई.
४. सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य.
५. सर्व मुख्य वनसंरक्षक.
६. सर्व वनसंरक्षक.
७. वन अभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व संबंधित अधिकारी यांना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन व दुय्यम संवर्ग), नागपूर यांचेमार्फत.
१०. निडनस्ती / फ-४, महसूल व वन विभाग.